# महाराष्ट्र शासन

क्रमांक:एसटीके-१०००/प्र.क्र.११९/२०००/१६-अ,
सामान्य प्रशासन विभाग.
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ८.१.२००१.

प्रति,

सर्व जिल्हाधिकारी,
महाराष्ट्र राज्य.

विषय :- शासकीय कर्मचारी संघटनांनी दि.१०.१.२००१ रोजी दिलेल्या एक दिवसाच्या लाक्षणिक संपाच्या सूचनेबाबत.

महोदय/महोदया,

काही शासकीय कर्मचारी संघटनांनी त्यांच्या मागण्यासंदर्भात दि.१०.१.२००१ रोजी एक दिवसाचा लाक्षणिक संप करण्याची सूचना शासनास दिली आहे. त्यानुसार शासनाचे व जिल्हा परिषदांचे गट 'क' व गट 'ड' मधील कर्मचारी संपात भाग घेण्याची शक्यता आहे. यासंदर्भात मला आपणास असे कळविण्याचे निदेश आहेत की, आपल्या जिल्हयातील सर्व विभागांच्या अधिकाऱ्यांची बैठक घेवून संपकाळात शासकीय कामकाज सुरळित पार पाडण्यासाठी योग्य त्या सूचना द्याव्यात व त्यांची अंमलबजावणी होण्याबाबत खबरदारी घ्यावी. यासाठी आवश्यता भासल्यास राज्य गृहरक्षक दलाची मदत घ्यावी.

संपाबाबतची कार्यवाही केल्याची माहिती विशेष दुताद्वारे किंवा फॅक्सने (क्र.०२२-२८१५०८३, २०२८५९४, २०२७३६५, २८१५०९२, २८१५०९८, २८१५०९५) कळवावी, ही विनंती.

आपली,

( शैला तारगे पाटील )
सह सचिव, महाराष्ट्र शासन.